**पुनर्वसन उपविभागाच्या अधिनस्त कार्यरत असलेली १७ पदे महसूल व वन विभागांतर्गत विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांचेकडे वर्ग करण्यास मंजुरी देणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१२/प्र. क्र. १५५/ई-८,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १२ मे, २०१५.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. ईएसटी-२०११/प्र. क्र. २८/र-७, दि. ०५/१२/२०११.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. ईएसटी-२०११/प्र. क्र. २९/र-७, दि. ०५/०३/२०१२.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकिर्ण-२०१२/अनौ.-६/प्र. क्र.४७/र-६, दि. २८/०९/२०१२.
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकिर्ण-२०१३/प्र. क्र.५८/र-६, दि. १६/११/२०१३.
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकिर्ण-२०१४/प्र. क्र.७/र-६, दि. १३/०५/२०१४.
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकिर्ण-२०१४/प्र. क्र.३४/र-६, दि. २९/१२/२०१४.
७) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांचे क्र.मशा/आस्था/कार्या- ३/इएनजी /पुर्नवसन उप विभाग, उल्हासनगर/मुदतवाढ/२०१३, दि.३१/०७/२०१४.
८) वित्त विभागाचे क्र. पदनि-२०१५/प्र.क्र.८८/१५/विसु-१, दिनांक ०२/०३/२०१५ चे पृष्ठांकनान्वये प्राप्त उच्च स्तरीय समितीच्या ९२ व्या दि. २८/०१/२०१५ च्या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना:-**

पुनर्वसन उपविभागाने त्यांच्या संदर्भाधीन अनुक्रमांक १ वरील दि. ०५/१२/२०११ च्या शासन निर्णयान्वये त्यांच्या अधिनस्त कार्यालयामध्ये कार्यरत असलेली एकूण १७ पदे महसूल विभागा अंतर्गत विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवर उच्चस्तरीय सचिव समितीच्या

मान्यतेशिवाय वर्ग केली होती. उच्चस्तरीय सचिव समितीसमोर दि.२८/०१/२०१५ रोजी सदर १७ पदे महसूल विभागाकडे वर्ग करण्याचा प्रस्ताव मंजुरीसाठी सादर करण्यात आला असता सदर उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.२८/०१/२०१५ च्या बैठकीत उक्त १७ पदे महसूल विभागांतर्गत विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांचेकडे खालील प्रमाणे वर्ग करण्यास मंजुरी देण्यात आली आहे.-

"पुनर्वसन उपविभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय स्तरावरील कार्यालयातील १७ अस्थायी पदे सद्यस्थितीत ५ वर्षाच्या मर्यादित कालावधीसाठी महसूल व वन विभागा अंतर्गत विभागीय आयुक्त, कोकण विभाग कार्यालयाकडे वर्ग करण्यात यावीत. सदर पदे अस्थायी म्हणून राहतील.

सद्यस्थितीत ३९५ प्रकरणे प्रलंबित आहेत. त्यामुळे सदर पदे ५ वर्षासाठी कार्यरत राहतील. त्यानंतर सदर कामकाज विभागांतर्गत सामावून घेण्यात यावे. ५ वर्षानंतर विभागाकडून सदर बाब पुढे चालू ठेवावी किंवा कसे, याबाबत आढावा घ्यावा व त्यामध्ये प्रकरणे प्रलंबित असल्याचे आढळल्यास विभागाने पुन्हा सविस्तर तपशीलासह उच्च स्तरीय सचिव समितीकडे प्रस्ताव सादर करावा. "

वरील मंजूरीस अनुलक्षून शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.-

**शासन निर्णय:-**

महसूल व वन विभागाच्या पुनर्वसन उपविभागांतर्गत कार्यरत असलेली खालील तपशिलाची १७ पदे महसूल विभागांतर्गत विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांचेकडे वर्ग करुन सदर पदे दि.०१/०२/२०१५ ते २९/०२/२०१६ या कालावधीसाठी चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.-

| अ. क्र. | संबंधित कार्यालय व पदनाम | पद संख्या | वेतन श्रेणी (रुपये) |
|---|---|---|---|
| (अ) | **उप विभागीय अधिकारी कार्यालय उल्हासनगर -एकूण १३ पदे.** | | |
| १ | लघुलेखक | १ | ९३००-३४८०० (ग्रेड पे-४३००) |
| २ | रोखपाल / वरिष्ठ वेतनश्रेणी लिपिक | १ | ५२००-२०२०० (ग्रेड पे-१९००) |
| ३ | वरिष्ठ वेतनश्रेणी लिपिक | ५ | ५२००-२०२०० (ग्रेड पे-१९००) |

| अ. क्र. | संबंधित कार्यालय व पदनाम | पद संख्या | वेतन श्रेणी (रुपये) |
|---|---|---|---|
| ४ | भाडे वसुलीकार लिपिक श्रेणी | १ | ५२००-२०२०० (ग्रेड पे-१९००) |
| ५ | शिपाई | १ | ४४४०-७४४० (ग्रेड पे-१४००) |
| ६ | सफाई कामगार | २ | ४४४०-७४४० (ग्रेड पे-१४००) |
| ७ | मजूर | २ | ४४४०-७४४० (ग्रेड पे-१४००) |
| | **एकूण पदे-** | **१३** | |
| **(ब)** | **प्रभारी अधिकारी, कोपरी वसाहत, ठाणे-एकूण २ पदे.** | | |
| १ | वरिष्ठ वेतनश्रेणी लिपिक | १ | ५२००-२०२०० (ग्रेड पे-१९००) |
| २ | चौकीदार | १ | ४४४०-७४४० (ग्रेड पे-१४००) |
| | **एकूण पदे-** | **२** | |
| **(क)** | **जमाबंदी आयुक्त,** (सचित मालमत्ता, नुकसान भरपाई व निर्वासित मालमत्तेचे परिरक्षक) यांचे कार्यालयातील आस्थापनेवरील **नायब तहसिलदार** | १ | ९३००-३४८०० (ग्रेड पे-४३००) |
| **(ड)** | **जिल्हाधिकारी, मुंबई शहर**, यांच्या कार्यालयातील आस्थापनेवर सर करीम भाई इब्राहीम ट्रस्ट या निर्वासित मालमत्तेच्या व्यवस्थापनासाठी नेमलेले **वसुली कारकून.** | १ | ५२००-२०२०० (ग्रेड पे-१९००) |
| | **एकूण पदे-** | **१७** | |

२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांनी सदर पदे अस्थायी असल्याने ती पुढे चालू ठेवण्यास दरवर्षी शासनाची मान्यता घ्यावी. तसेच सदर पदांना माहे फेब्रुवारी, २०२० पर्यंत कार्यरत ठेवण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिली असल्याने सदर १७ पदे पुढे चालू ठेवण्याबाबत आढावा घेण्यासाठी प्रस्ताव उचित समयी विभागीय आयुक्तांनी कामाच्या गरजेनुसार शासनास सादर करावा.

३. उपरोक्त पदे महसूल व वन विभागाच्या संबंधित कायम संवर्गातील अतिरिक्त अस्थायी पदे म्हणून राहतील. पदधारकांना शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

४. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक सी-१, २०५३-जिल्हा प्रशासन, (१०१) आयुक्त (०१) (०१) आयुक्त कोकण (२०५३ ०३८७) ०१, वेतन" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येवून मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३५५/विसु, दिनांक १८/११/२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने तसेच उच्चस्तरीय सचिव समितीच्या संदर्भाधीन दि.०२/०३/२०१५ च्या पृष्ठांकनाद्वारे प्राप्त कार्यवृतास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०५०२१२५४०६५८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chandrakant Nivrutti Padale
Date: 2015.05.12 12:37:59 +05'30'

( चं. नि. पाडळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. प्रधान सचिव ( महसूल ), यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. सचिव ( मदत व पुनर्वसन ), यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र -१, मुंबई.
५. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र -१, मुंबई.
६. जमाबंदी आयुक्त, ( संचित मालमत्ता, नुकसान भरपाई व निर्वासित मालमत्तेचे परिरक्षक ) महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय, युनायटेड इंडिया बिल्डींग, ४ था मजला, सर पी. एम. रोड, फोर्ट, मुंबई-०१.
७. जिल्हाधिकारी, ठाणे, मुंबई शहर व मुंबई उपनगर.

८. निवासी उपजिल्हाधिकारी तथा अभिरक्षक, निर्वासित मालमत्ता, मुंबई शहर, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई-०१.

९. उप विभागीय अधिकारी, उल्हासनगर, पवई चौक, कॅम्प नं. ३, उल्हासनगर-४२१ ००३.

१०.संकोष मालमत्तेचे सहायक अभिरक्षक व व्यवस्थापकीय अधिकारी ( मुंबई शहर ), युनायटेड इंडीया बिल्डींग, ४ था मजला, सर पी. एम. रोड, फोर्ट, मुंबई-०१.

११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१२. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

१३. वित्त विभाग , कार्यासन व्यय -९, अर्थसंकल्प-६ व वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-३२.

१४. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.

१५. उपकोषागार अधिकारी, कोकण भवन, पहिला मजला, नवी मुंबई.

१६.उप सचिव, कार्यासन ब-१/ई-७/ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१७. उप सचिव, कार्यासन र-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१८. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.